**प्रकरण दोन (सामाजिक आघात निर्धारण) व तीन (अन्न सुरक्षा विषयक तरतूदी) च्या तरतूदी लागू करण्यापासून सूट देण्याच्या प्रस्तावास शासन मान्यता देण्याचे अधिकार <u>प्रत्यायोजित करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन स्थायी आदेश क्रमांक- एसआयए-२०२३/प्र.क्र.१०५/अ-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तारीत इमारत ४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०८ जून, २०२३.

**<u>स्थायी आदेश:-</u>**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद १६६ अन्वये तयार करण्यात आलेल्या, महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीतील नियम १५ खाली महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी महाराष्ट्र राज्याचे कामकाज अधिक सोयीस्कर रितीने चालण्यासाठी दिलेल्या अनुदेशातील भाग-दोन, सर्वसाधारण मधील अनुदेश क्र. ४ अन्वये मा. मंत्री (महसूल) यांनी असे निर्देशित केले आहे की, भूसंपादन, पुनर्वसन व पुर्नस्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम, २०१३ या मूळ अधिनियमामध्ये राज्य शासनाने भूमिसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत करताना उचित भरपाई मिळण्याचा आणि पारदर्शकतेचा हक्क अधिनियम (महाराष्ट्र सुधारणा), २०१८ अन्वये महाराष्ट्र राज्यासाठी केलेल्या अतिरिक्त तरतुदी अन्वये राज्यात विविध प्रकल्पांकरीता खाजगी जमिनी संपादित करण्यात येतात. अशा संपादनाच्या प्रसंगी उक्त नमूद अधिनियमाच्या कलम १० क अन्वये "प्रकरण दोन (सामाजिक आघात निर्धारण) व तीन (अन्न सुरक्षा विषयक तरतूदी)" पासून सूट देण्याचे प्रस्ताव शासनास वेळोवेळी प्राप्त होतात. अशा प्रकरणांचा त्वरेने निपटारा होणे आवश्यक आहे.

यास्तव, उक्त नमूद अधिनियमाच्या कलम १० क अन्वये "प्रकरण दोन (सामाजिक आघात निर्धारण) व तीन (अन्न सुरक्षा विषयक तरतूदी)" या पासून सूट देण्याकरीता शासनाच्या मान्यतेस्तव प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांची गुणवत्ता तपासून, त्याबाबतची अधिसूचना शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यास शासन मान्यता देण्याचे मा. मंत्री (महसूल) यांचे अधिकार प्रधान सचिव (वने, भूसंपादन) यांना या आदेशाव्दारे प्रत्यायोजित करण्यात येत आहेत.

०२. सदरचे स्थायी आदेश हे तात्काळ अंमलात येतील.

०३. सदर स्थायी आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०६०८१७४८३३४५१९ असा आहे. सदर स्थायी आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL S KOTHEKAR

Digitally signed by SUNIL S KOTHEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=a4e83b3f4c3a086b626255c2b2cb37acdeb67b59b5e9ecbb4d25b60ccef2c660, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C55205CA6D1113BFAEC735BD2D1C5326D6B007C5CD3A46A6E4C4857E58AD2AFE, cn=SUNIL S KOTHEKAR
Date: 2023.06.08 17:49:11 +05'30'

**(सुनिल कोठेकर)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ३२

३) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ३२.
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई - ३२.
५) अपर मुख्य सचिव (महसूल) महसूल व वन विभाग, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ३२.
६) प्रधान सचिव (वने, भूसंपादन), मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) प्रधान सचिव (विधी), विधी व न्याय विभाग, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ३२.
८) उपसचिव, आस्थापना (महसूल व वन विभाग), मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ३२.
९) कक्ष अधिकारी (अ-१, अ-२, अ-३ व अ-४)
१०) निवडनस्ती (अ-२)

***********************************